**शासन सेवेत नियुक्ती होताना माजी सैनिक उमेदवारांना टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी दोन संधी तसेच दोन वर्षे इतकी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१८०/२८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३० ऑगस्ट, २०१८.

वाचा :- १. शासन राजपत्र, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक SRV-१०९३/C.R.१०/९३/XII, दिनांक ०३.०९.१९९३
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक आरटीआर-२०१४/ प्र.क्र.३५५/ १२, दिनांक ०६.०६.२०१७ .

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ व २ मध्ये लिपिक-टंकलेखक पदावर माजी सैनिकातून नियुक्त झालेल्या व्यक्तीने मराठी टंकलेखनाचे किमान ३० शब्द प्रति मिनिट वेगमर्यादेचे किंवा इंग्रजी टंकलेखनाचे किमान ४० शब्द प्रति मिनिट वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र किंवा संगणक टंकलेखनाचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक आहे. तसेच सदर प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून ११ महिन्यांच्या कालमर्यादेत धारण न केल्यास, सदर व्यक्तीची सेवा समाप्त करण्यात येईल, असे नमूद केले आहे.

टंकलेखन परीक्षा ही टंकलेखन संस्थेमार्फत एका वर्षातून दोन वेळा(मे/जून व नोव्हेंबर/डिसेंबर महिन्यात)आयोजित केली जाते. त्यानंतर सुमारे दोन महिन्यांच्या कालावधीनंतर सदर परीक्षेचा निकाल घोषित केला जातो. सदर परीक्षेस बसण्याकरिता उमेदवारांना किमान ५½(साडे पाच ) महिन्याचे टंकलेखनाचे प्रशिक्षण आवश्यक असते. या सर्व बाबी विचारात घेवून भूकपग्रस्त, स्वातंत्र्य सैनिकांचे नामनिर्देशित पाल्य, सन १९९१ चे जनगणना कर्मचारी, सन १९९४ नंतरचे निवडणुक कर्मचारी व पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन कर्मचारी, अनुकंपा तत्वावर नियुक्त होणाऱ्या लिपिक-टंकलेखक तसेच अपंग उमेदवार यांचेसाठी टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याची नियुक्तीच्या दिनांकापासून कालमर्यादा २ वर्षे इतकी करण्यात आलेली आहे. त्याच आधारे माजी सैनिक कर्मचाऱ्यांनाही मराठी/इंग्रजी टंकलेखनाची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी काही अवधी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन सेवेत माजी सैनिक उमेदवारांना जर लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती मिळाली, तर त्यांना टंकलेखनाची(इंग्रजी/मराठी) परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी नियुक्तीच्या

दिनांकापासून २ वर्षाच्या कालावधीत व २ संधीत सदर परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी अवधी व संधी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. माजी सैनिक उमेदवारांना लिपिक - टंकलेखक पदावर नियुक्ती दिलेल्या व शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत नियुक्तीपासून २ वर्षे पूर्ण न झालेल्या उमेदवारांनाही सदर प्रमाणपत्र सादर करण्यासाठी उमेदवारांच्या नियुक्तीपासून २ वर्षे इतकी मुदत देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय साप्रवि/कार्या.१६-अ च्या अनौ.संदर्भ क्र.५९/१६-अ, दिनांक ०५.०५.२०१८ व साप्रवि/कार्या.१२ च्या अनौ.संदर्भ क्र.६४९/का.१२, दिनांक २०.०५.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०९०६१२०६२९८७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Suresh M. Khade
Date: 2018.09.06 12:12:16 +05'30'

(सु.म.खाडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०० ०३५.
४. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८. प्रधानसचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई.
१०. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई ३२
११. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई ३२
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१३. सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४. मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख, महाराष्ट्र राज्य
१५. सर्व महानगर पालिकांचे आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१६. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.

१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
१९. प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
२१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
२२. उप सचिव ( आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२३. सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा व अपील शाखा, मुंबई , औरंगाबाद व नागपूर
२४. सरकारी वकील, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद व नागपूर
२५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
२६. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
२७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती).
**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन निर्णय प्रसिध्द करण्यात यावा.**
२८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२९. राज्यातील सर्व महामंडळे, मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य.
३०. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये.
३१. निवड नस्ती/कार्यासन २८.